ऐकणे ह्यामध्ये तिची रुची निर्माण होते कारण रोज बदलणारी धोरणे किंवा राजकीय घटनांबद्दल माहिती घेणे हे आता तिच्या जीवनाशी प्रत्यक्ष जोडले जाते. ह्या उलट गृहिणीला ते थेट प्रभावित करत नसल्यामुळे याची फार आवश्यकता नसते. त्यामुळे वृत्तपत्रे व नियतकालिके वाचण्यामध्ये गृहिणीला फारसा रस नसतो, मासिके वाचली तरी स्त्रियांची मासिके ती उत्सुकतेने चाळते.

सामाजिक उत्पादनाच्या प्रक्रियेत सामील झाल्यामुळे समाजात तिची स्वतंत्र ओळख निर्माण होते जी पूर्वी कोणाची तरी आई, बहिण, पत्नी, मुलगी अशी असते त्यापेक्षा वेगळी असते. ती करत असलेल्या तिच्या कामाच्या आधारावर लोक तिला ओळखू लागतात. आता ती कमावत असल्यामुळे तिला हवा तिथे ती खर्च करू शकते. आता तिला तिचे छंद, कौशल्य, मग ते संगीत वा नृत्य शिकणे असो, पुस्तके वाचणे असो किंवा नाटक–सिनेमा पाहणे असो ते सुरू करणे शक्य होते. अशा अनेक स्त्रिया आहेत की ज्यांना चित्रकला, संगीत, नृत्य या सारख्या विषयांमध्ये गती असते. पण कधी कुटुंबावर आर्थिक भार पडेल म्हणून तर कधी कुटुंबाने प्रोत्साहन न दिल्यामुळे आपल्या प्रतिभांचा विकास त्या करू शकत नाहीत. आर्थिकदृष्ट्या सक्षम असणारी स्त्री इतरांनाही मदत करू शकते. अशा कितीतरी स्त्रिया स्वकमाईतून आपल्या लहान भावाबहिणींच्या शिक्षणासाठी मदत करताना दिसतात.

बहुतांश लोक स्त्रियांनी नोकरी करण्याच्या विरोधात असतात कारण त्यांना वाटते की कुटुंबाची घडी विस्कटेल. त्यांचे म्हणणे—घरातील कामे कोण करणार? प्रथम हा प्रश्न उपस्थित करण्याची गरज आहे की, घरकाम ही फक्त स्त्रीची जबाबदारी आहे का? त्यात नवऱ्यानेसुद्धा भागीदारी करावयास नको का? ज्या घरातील स्त्री नोकरी करणारी आहे आणि नवराही घरकामात सहभागी असतो, त्यांची मुले लवकर स्वावलंबी होतात. लहानपणापासूनच ती छोटी-मोठी कामे करायला शिकतात.

दुसरे, आपल्या आसपासची नोकरी करणाऱ्या स्त्रियांची कुटुंबे पाहिल्यावर ती व्यवस्थित चाललेली दिसतात. नोकरी करणारी स्त्री घरकाम आणि बाहेरील काम या दोन्हीला चांगल्याप्रकारे न्याय देते. एवढेच नाही तर तिच्या कमाईमुळे घर आर्थिकदृष्ट्या बळकटच होते. तिच्या वेळेचा सदुपयोग व कामाची विभागणी ती अतिशय नेटकेपणाने करते.

तिसरे, जिथे पती–पत्नी दोघेही नोकरी करतात, त्या घरातील वातावरण गृहिणींच्या कुटुंबांपेक्षा फार वेगळे असते. दोघेही काम करत असलेल्या पती–पत्नीचे नातेही मैत्रीपूर्ण होते. दोघेही आपापल्या कामाच्या ठिकाणी येणाऱ्या समस्यांबाबत

एकमेकांशी चर्चा करून एकमेकांचा सल्ला घेतात. दोघांमध्ये विविध सामाजिक–राजकीय विषयांवर गप्पा होतात, कारण स्त्रीच्या सामाजिक कामातील सहभागामुळे तिला बाहेरच्या जगाबद्दल माहिती होते. घरातील असे मनमोकळे वातावरण मुलांवर चांगले संस्कार रुजविण्यास मदत करते. एखाद्या गृहिणीला—जरी ती सुशिक्षित असली तरी—तिचा पती आपल्या कामातील अडचणी सांगत असला तरी तिला ते ऐकण्यात फारसा रस नसतो. घराबाहेरील जगाशी तिचा फारसा संबंध येत नसल्यामुळे, पतीच्या कामावरील समस्यांवर ती बोलू शकत नाही किंवा बौद्धिक चर्चाही करू शकत नाही.

अखेरचे आणि सर्वात महत्त्वाचे, काही कारणांमुळे नवऱ्याबरोबरचे संबंध बिघडले किंवा त्याचा आकस्मिक मृत्यू झाला तर आर्थिकदृष्ट्या सक्षम असलेली स्त्री आपले आणि आपल्या मुलांचे पालनपोषण स्वाभिमानाने करू शकते तर घरात राहणारी स्त्री सासर आणि माहेर या दोन्हींवर ओझे बनते; आणि पुढील आयुष्यामध्ये अपमानित जिणे जगावे लागते.

अनेक स्त्रिया असा विचार करतात की आपले आयुष्य तर कसेबसे व्यतीत झाले आता आपल्या मुलीचा विचार करायला पाहिजे. पण आपणच जर आपली बंधने तोडू शकलो नाही तर पुढच्या पिढीला देण्यासाठी आपल्याकडे काहीच असणार नाही. म्हणजेच जी सुरुवात आपण करायला हवी होती ती आपण आपल्या मुलीच्या खांद्यावर टाकून मोकळे. परंतु आव्हानांना घाबरून जीवनातून माघार घेऊन पळून जाण्याचा हा प्रकार आहे. अशी आशा निष्फळ असते, कारण स्वतःची बंधनेच जर आपण धैर्याने तोडू शकलो नाही, तर पुढच्या पिढीला आपण ते धैर्य कोठून देणार?

स्त्रियांच्या स्वावलंबनाचा आणखी एक महत्त्वपूर्ण पैलू हा ही आहे की जोपर्यंत समाजातील अर्ध्या लोकसंख्येचा—स्त्रियांचा—सामाजिक उत्पादनात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष सहभाग होत नाही तोपर्यंत कोणत्याही समाजाचा खऱ्या अर्थाने विकास शक्य नाही.

स्त्रियांना पितृसत्ताक गुलामीतून मुक्त होण्यासाठी घराबाहेर पडून नोकरी करून, आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होणे हे पहिले पाऊल असेल. पण आज चांगली नोकरी मिळणे हे अत्यंत अवघड झाले आहे. गेल्या दोन दशकात खाजगीकरण, उदारीकरणाच्या या काळात देशातील अनेक उद्योगधंदे बंद पडत आहेत. आपल्या देशातील नेते मोठमोठ्या कॉर्पोरेशन्सचा नफा वाढवण्यासाठीच देश चालवत आहेत. या महाकाय कंपन्यांना नफा आणि फक्त नफा कमावण्यातच स्वारस्य आहे.

जास्तीतजास्त नफा मिळविण्यासाठी कॉर्पोरेशन्स कमीतकमी कामगारांना किमान वेतनावर ठेवतात. काही मूठभर चांगल्या पगाराच्या नोकऱ्या सोडल्या तर बाकी सर्वसाधारण नोकऱ्या कमी पगारांच्या आणि असंघटित क्षेत्रात आहेत. आणि म्हणूनच आज महिलांच्या स्वातंत्र्याचा आणि मुक्तीचा संघर्ष पुढे घेऊन जायचा असेल तर त्यांना रोजगार मिळवण्यासाठी लढा देणाऱ्या लोकांच्या संघर्षात सामील व्हायला लागेल आणि रोजगाराच्या संधी उपलब्ध करून देण्याची मागणी करायला लागेल. कंत्राटी रोजगार बंद करून कायमस्वरुपी रोजगाराची मागणी करायला लागेल. स्त्री संघटनांसह सर्व जनआंदोलनांना एक नवसमाज निर्माण करायचा आहे की ज्यात प्रत्येकाला कामाचा जन्मसिद्ध अधिकार असेल, स्थिर उत्पन्न, निवारा, आरोग्यसुविधा तसेच वृद्धापकाळातील सुविधा या गोष्टींना प्राधान्य असेल आणि यावरच भर दिला जाईल. तो समाज खरोखरच मुक्त आणि लोकशाहीवादी असेल.

हा अर्थातच दीर्घकालीन संघर्ष आहे. पण, तोपर्यंत आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होण्यासाठी कमी पगाराची का असेना पण मिळेल ती रोजगाराची संधी स्वीकारणे महत्त्वाचे आहे. आपण जेव्हा घराबाहेर पडू आणि मुक्त होऊ तेव्हाच असा समाज निर्माण करू शकतो जिथे सर्वांना रोजगारासाठी प्राधान्य दिले जाईल. स्त्री–पुरुष समानता असलेल्या समाजासाठी ते पहिले पाऊल आहे.

* * *


## Our English Publications

| | |
|---|---|
| Palestine, Israel and the Arab–Israeli Conflict | ₹ 10/– |
| Demonetisation: Yet Another Fraud on the People | ₹ 10/– |
| The Crisis of Global Warming | ₹ 15/– |
| Let's Rise from the Shadows! | ₹ 15/– |
| Who was Shivaji? (Writer: Com. Govind Pansare) | ₹ 20/– |
| Neoliberal Fascist Attack on Education | ₹ 25/– |
| The Unemployment Crisis: Reasons and Solutions | ₹ 25/– |
| Is the Government Really Poor? | ₹ 25/– |
| Globalisation or Recolonisation? | ₹ 150/– |
| Education under Globalisation | ₹ 275/– |
| Essays on Contemporary Indian Economy | ₹ 275/– |
| Nuclear Energy: Technology From Hell | ₹ 295/– |

९



# पुरुषही घडविला जातो

या आधीच्या सर्व लेखांमधून आपण पितृसत्तेमध्ये स्त्रियांची काय परिस्थिती असते याची चर्चा केली. या पितृसत्ताक व्यवस्थेचा पुरुषांवर काय परिणाम झाला आहे यावर या लेखात चर्चा करत आहोत. जसे 'स्त्री जन्माला येत नाही, घडवली जाते' तसेच 'पुरुषही जन्माला येत नाही, घडवला जातो'. पितृसत्ताक व्यवस्था ही स्त्रीमध्ये स्त्रीत्वाची भावना जागृत करते तर पुरुषामध्ये पितृसत्तेला पोसण्याचे काम 'मर्दानगी' करते. पितृसत्ताक व्यवस्था स्त्रियांमध्ये दुय्यमत्वाची भावना निर्माण करते तर पुरुषांमध्ये श्रेष्ठत्वाची भावना निर्माण करते. ही श्रेष्ठतेची भावना आणि यातून निर्माण होणाऱ्या मूल्यांना व व्यवहारांना मर्दानगी म्हणतात.

निसर्गाने स्त्री आणि पुरुष यांच्यात फक्त २–३ फरक केले आहेत, आणि ते ही पुनरुत्पादनाच्या प्रक्रियेसाठी. लिंगाव्यतिरिक्त बाई मुलाला जन्म देऊ शकते म्हणून तिला गर्भाशय आहे आणि मुलाचे पालनपोषण करण्यासाठी छाती. आपण हे लक्षात घेतले पाहिजे की निसर्गाने भेद निर्माण केला आहे, भेदभाव नाही. पुनरुत्पादनासाठी

सहकार्याची गरज आहे, हिंसेची नाही, श्रेष्ठ–कनिष्ठ असण्याची गरज नाही. पण आपण त्याला असमानतेशी जोडले आणि स्त्री–पुरुषांमध्ये भेदभाव सुरू केला. या असमानतेनेच पुरुषप्रधानतेला जन्म दिला आणि पुढे जाऊन ती पितृसत्ताक व्यवस्था बनली ज्यामध्ये संसाधने, निर्णय घेणे आणि विचारधारेवर पुरुषांचे नियंत्रण आहे.

महाविद्यालयीन विद्यार्थ्यांबरोवर पुरुषभानाचे (मर्दानगी समजून घेतानाचे) कार्यक्रम करत असताना आम्ही मुलांना खरा मर्द असण्याची लक्षणे कोणती हा प्रश्न विचारला. गरज असेल तेव्हा स्त्रियांचे रक्षण करणारा, धीट, मेहेनती, कर्तबगार, ताकदवार, समजदार, आक्रमक, दबंग, कधी न रडणारा, तगडा, बहादूर, गरम रक्ताचा, निधड्या छातीचा, जिगरबाज, इत्यादी व्याख्या त्यांनी सांगितल्या. या व्याख्या बरोबर आहेत का हा प्रश्न मुलींना विचारला असता त्यांनी यातील बहुतेक सर्व व्याख्या मान्य केल्या. यातील काही त्यांना आवडतातही. पण त्याचबरोबर त्यांनी हे पण सांगितले की पुरुष अहंकारी, रागीट आणि नियंत्रण ठेवणारे असतात जे त्यांना आवडत नाही.

पण वस्तुस्थिती ही आहे की अहंकारी, रागीट आणि नियंत्रण ठेवणारे हे गुण मुलांनी मर्दानगीच्या सांगितलेल्या व्याख्येमधूनच येतात. अहंकारी, रागीट आणि नियंत्रण ठेवणारे मिळून एक खतरनाक रसायन बनते—मर्दानगी. पुरुषाला सत्ताधारी, आक्रमक आणि हिंसक रूपात प्रस्थापित करणारी, या मूल्यांना समाजमान्यता देणारी ती एक सामाजिक परिभाषा आहे जी पितृसत्तेने निर्माण केली आहे. पुरुषही 'पुरुष' म्हणून घडवला जातो असे म्हणताना मर्दानगी समजून घ्यायची तर पुरुषांची जडणघडण लहानपणापासून कशी होते हे पाहायला लागेल.

अगदी लहान असतानासुद्धा मुलाने फ्रॉक घालायचा म्हटले तर 'तू काय मुलगी आहेस का?' म्हणून चेष्टा केली जाते, कधी खेळताना मार खाऊन मुलगा रडत घरी आला तर 'रडतोस काय बायकांसारखा?' असे म्हटले जाते, कधी अपमान करायचा असेल तर 'बांगड्या भर बायकांसारख्या' असे सांगितले जाते—अशा अनेक वाक्यांनी आपण त्या लहानशा मुलाला पुरुष बनवण्याची सुरुवात करतो. बऱ्याच घरांमध्ये मोठ्या बहिणीला सोबत म्हणून लहान भावाला बरोबर पाठवले जाते; तेव्हापासूनच तो संरक्षकाच्या भूमिकेत जातो. घरामध्ये, नातेवाईकांमध्ये व समाजात तो प्रत्येक क्षणी पुरुषप्रधानता बघत असतो व त्याचेच अनुकरण करायला लागतो.

मर्दानगीचा एक महत्त्वपूर्ण पैलू हिंसा आहे. अनेक जण असे म्हणू शकतात की पुरुष स्वभावतःच हिंसक असतात. पण तसे नाहीये. जन्मतः हिंसक कुणीच नसतो. पुरुषांना हिंसक बनवण्यात समाजाचा मोठा वाटा आहे. लहानपणापासून मुलग्यांना

आपण खेळणी म्हणून बंदुका, गदा, स्पायडरमॅन यांच्यासारख्या गोष्टी देतो. अनेकदा जेवायला वाढायला उशीर झाला म्हणून ताट फेकून मारणारे किंवा येता जाता आईचा अपमान करणारे आणि आईवर हात उचलणारे वडील मुलाने लहान असल्यापासूनच पाहिलेले असतात. स्त्रियांचे स्थान बरोबरीचे नाही, त्यांच्यावर हात उगारला जाऊ शकतो हे मूल्य त्यांच्या मनात ठसवले जाते. कुटुंब ही मुलांना 'पुरुष' बनवण्याची मोठी प्रयोगशाळा आहे. आणि मग मोठे झाल्यावर मुली जसे आईचे अनुकरण करतात तसेच मुलगेही वडिलांचे अनुकरण करू लागतात, हिंसक बनतात. आणि मग ती हिंसा स्त्रियांपुरती मर्यादित राहत नाही तर पुरुषा–पुरुषांमध्येही पोहोचते. मर्दानगीमध्ये हिंसा निहित आहे.

फक्त पुरुषांमध्येच नाही तर समाजातही हिंसा पसरवण्यामध्ये प्रसारमाध्यमे आणि सिनेमे यांची महत्त्वपूर्ण भूमिका आहे. ह्या माध्यमांचा समाजावर तर परिणाम होतोच पण स्त्री–पुरुष संबंधांवरही मोठा परिणाम होत असतो. मुलींबरोबर कुठल्याही प्रकारे वागले तरी त्यांना ते आवडते; त्यांच्यावर जबरदस्ती केली तरी त्यांना ती आवडते; पत्नी किंवा प्रेमिकेवर बिनदिक्कत हात उचलता येतो; बाई 'माणूस' नाहीच तर वस्तू किंवा आयटम आहे; आणि सगळयात महत्त्वाचे म्हणजे मुलगी जेव्हा नाही म्हणते तेव्हा खरे तर तिचा होकार असतो—सिनेमांमध्ये तर हे सर्व उघड उघड दाखवले जाते आणि हे सगळे घडत असतानाही शेवटी हिरोला हिरॉईन मिळते. अशी मूल्ये जर प्रसारमाध्यमे आणि सिनेमातून मिळत असतील तर मुलगे हिंसक का होणार नाहीत? प्रत्यक्ष आयुष्यात एखादी मुलगी मुलाला नाही म्हणू शकते. सिनेमातली मूल्ये आणि मर्दानगीचा अहंकार ह्या दोन्ही गोष्टींमुळे मुलगा हिंसक बनतो. ह्याचा शेवट मुलीला मारून टाकण्यामध्ये किंवा तोंडावर ॲसिड फेकण्यामध्ये होतो.

स्त्रियांवरील हिंसा आज एवढ्या मोठ्या प्रमाणात वाढल्या आहेत की भारतात ६०% नवरे कधी ना कधी आपल्या बायकांवर हात उचलतात, दर २२ मिनिटाला एक बलात्कार होतो आणि एका दिवसात दोन स्त्रियांना कुठल्या ना कुठल्या कारणाने मारले जाते. हे जणू काय कमी आहे म्हणून आम्ही गेल्या २० वर्षात १ कोटी मुलींना संपवून टाकले आहे—जन्मालाच घातले नाही किंवा जन्मल्याबरोबर लगेच मारून टाकले.

गेल्या काही वर्षात 'मर्दानगी' शी जोडलेल्या हिंसेचा एक नवीनच पैलू समोर आला आहे ज्याचा आजच्या राजकारणाशी गहन संबंध आहे. पुरुषी सत्तेला आव्हान देणाऱ्या माणसांना धडा शिकवण्यासाठी खैरलांजी भगिनींवर आठ ग्रामपंचायत पदाधिकारी बलात्कार करून हत्या करतात, हे जातीयवादी हिंसक पुरुषी मानसिकतेचे

उदाहरण आहे. 'लव्ह जिहाद'सारखा बागुलबुवा उभा करणे असो की 'ऑनर किलिंग', हे सारे संस्कृतिरक्षणाच्या नावाखाली स्त्रियांच्या लैंगिकतेवर संपूर्ण वर्चस्व आणि नियंत्रण मिळविण्याचेच मार्ग आहेत.

जगभरात सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक पातळीवर जितक्या हिंसक गोष्टी घडतात त्या सगळ्याच्या मागे मर्दानगीचा पण हात आहे. ९५% गुन्ह्यांमागे कुठल्या ना कुठल्या पुरुषाचा हात असतो. पैशांसाठी होणाऱ्या हिंसेपासून दहशतवाद, जाती–धर्माच्या नावावर होणारे अत्याचार ह्या सगळ्यामागे अन्य कारणांव्यतिरिक्त मर्दानगीही एक कारण आहे.

गेल्या १००–१५० वर्षात स्त्रियांना हे कळून चुकले आहे की पितृसत्ता धोकादायक आहे. पुरुषांना का नाही समजले? आश्चर्याची गोष्ट आहे की पुरुषांनी एकत्र येऊन पितृसत्तेविरोधात उभे राहण्याचा विचार नाही केला. हां! व्यक्तिगत पातळीवर जे समजदार होते त्यांनी याविरोधात आवाज उठवला, जसे गौतम बुद्ध, मोहम्मद पैगंबर, रामसामी पेरियार, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा गांधी आणि महात्मा फुले. हे सगळे पुरुष होते पण त्यांनी पितृसत्तेचा विरोध केला. पण सामान्य पुरुषांनी ह्याच्या विरोधात आवाज उठवला नाही, पितृसत्तेच्या विरोधात चळवळही उभी केली नाही. कारण या व्यवस्थेतून त्यांना मिळत असलेले फायदे—कुलदिपक, वंशाचा दिवा, संपत्ती त्यालाच मिळणार, कुटुंबप्रमुख तोच, इ.—इतके पसंत आहेत की त्यातील वाईट गोष्टी त्यांना दिसत नाहीत.

आता रोजच्या आयुष्यात मर्दानगीमुळे पुरुषांचे काय नुकसान होत आहे ते पाहूया. वर उदाहरण दिलेच आहे की ७–८ वर्षाचा मुलगा, त्याला बहिणीबरोबर चौकीदारी करायला बाहेर पाठवले जाते. किंवा बहिण कुठे जाते, कोणाशी बोलते यावर नजर ठेवायला पाठवले जाते. पण हीच चौकीदारी त्याला नंतर आयुष्यभर करावी लागते. कुणाला स्टेशनवर सोडायला जा, तर कुणाला बसस्टँडवरून रात्री आणायला जा.

मुलांना त्यांच्या भावना व्यक्त करायला दिल्या जात नाहीत. 'मर्द को दर्द नही होता', 'असली मर्द रोता नही है' अशी अनेक वाक्ये आपण नेहमी ऐकत असतो. पुरुषांना एखाद्या गोष्टीचे वाईट वाटू शकत नाही का? त्यांना दुःख होत नसेल का? रडावेसे वाटत नसेल का? नक्कीच वाटत असेल पण पुरुष त्यांच्या या भावना व्यक्त करू शकत नाहीत. एवढेच नाही तर घरातील जवळची व्यक्ती वारली तरी त्याने रडता कामा नये असे आम्ही लहानपणापासूनच त्याच्यावर बिंबवले आहे. माणूस आहे तिथे

भावना असणारच. पण पुरुषांना त्याचे प्रदर्शन करण्याची मुभा समाजाने दिलेली नाही. त्याचे भावनिक खच्चीकरण केले जाते. तो हे म्हणू शकत नाही की मला भीती वाटते; मला हे काम जमत नाही. म्हणूनच पुरुष जेव्हा अयशस्वी होतो तेव्हा त्याच्यात नूनगंड निर्माण होतो, दारूमध्ये आपले अपयश विसरण्याचा प्रयत्न करतो, किंवा आत्महत्या करतो. गेल्या दोन दशकात शेतीच्या वाढत्या संकटामुळे तीन लाख पुरुष शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्या आहेत. पण एकाही शेतकरी महिलेने आत्महत्या केलेली नाही.

त्याचबरोबर, आयुष्यातल्या अनेक छोट्या छोट्या आनंद देणाऱ्या गोष्टींनाही तो मुकतो. कपड्यांचेच उदाहरण द्यायचे झाले तर मुलींच्या कपड्यांमध्ये आणि कपड्यांच्या रंगांमध्ये प्रचंड विविधता आहे. पण पुरुषाला बिचाऱ्याला ठराविक रंगाचेच कपडे घालायला लागतात. तेच ते शर्ट–पँट आणि तेच ते फिकट निळ्या, पिवळ्या नाहीतर पांढऱ्या रंगाचे कपडे. मुलांना सांभाळण्यातला आनंद, स्वतः पदार्थ करून दुसऱ्याला खायला घालण्यातला आनंद, दुसऱ्याची सेवा करण्यातला आनंद हे सगळे आनंद पुरुषाकडून हिरावून घेतले आहेत. त्यांना काहीच येत नाही. ना शिवणकाम, ना भरतकाम, ना विणकाम. एकच गोष्ट येते ती म्हणजे पैसे कमावणे. त्यांना पैसे कमावण्याचे मशीन बनवून टाकले आहे.

पण ह्या सगळ्यापेक्षा पितृसत्तेने भयंकर वाईट गोष्ट केली आणि ती म्हणजे पुरुषांना माणूसपणापासून दूर नेले. १६ वर्षाचा मुलगा वयाने कितीतरी मोठ्या असलेल्या बाईवर बलात्कार करतो, रस्त्यातून, बसमधून जाताना कोणी अनोळखी स्त्रीच्या शरीरावरून हात फिरवतो, ६०% पुरुष आपल्या पत्नीवर हात उचलतात— यांना माणूस म्हणावे का? जाती–धर्माच्या नावावर दुसऱ्या जातीतील किंवा धर्मातील मुलीवर बलात्कार करतात. आपल्याच शरीराचा हत्यार म्हणून वापर करतात. जगातली अर्धी लोकसंख्या जर माणुसकीपासून इतकी दूर गेलेली असेल तर १०० कोटी महिलांवर हिंसा होणारच. पुरुष खरेच असेच असतात का? नाही. पुरुषसत्ताक व्यवस्था त्यांना असे बनवते.

आज देशभरात केवळ महिलाच नाही तर पुरुषही स्त्रियांवर होणाऱ्या हिंसेविरोधात आवाज उठवत आहेत, रस्त्यावर उतरत आहेत, आंदोलनात सामील होत आहेत—जसे आपण निर्भया हत्याकांडाच्या वेळी पाहिले. गरज आहे पुरुषांनी आपले 'पुरुषभान' जागवण्याची, आपली माणुसकी वाचवायची.

पुरुषांना हे समजून घ्यायला लागेल की जोपर्यंत स्त्री स्वतंत्र होणार नाही तोपर्यंत पुरुषही स्वतंत्र होऊ शकत नाही. पितृसत्तेविरुद्ध लढाई दोघांनाही अंतिमत: माणूसपणाकडे नेणारी आहे.

* * *



# समतामूलक समाजासाठी

स्त्री आणि पुरुष हे दोघेही समाजाचे महत्त्वाचे अंग आहेत. समाज चालवण्यासाठी दोघांचेही सारखेच महत्त्व आहे. मग एकाचा दर्जा वरचा आणि दुसऱ्याचा खालचा हे कसे झाले? हा विचार करण्यासारखा विषय आहे. स्त्रियांची गुलामीची ही अवस्था सुरुवातीपासूनच अशी आहे का? आणि पुढेही तशीच राहील का?

मानववंशशास्त्रज्ञांनी हे दाखवून दिले आहे की सुरुवातीच्या काळात स्त्री–पुरुषांमध्ये समानता होती. इतिहासात मनुष्यप्राण्याच्या पृथ्वीवरील वास्तव्याच्या अधिकांश काळात माणूस समतावादी समाजात राहत होता. मानवी समाज जिवंत ठेवण्यासाठी आवश्यक असलेल्या पुनरुत्पादनाच्या क्षमतेमुळे स्त्रियांबद्दल समाजात आदर होता. आणि म्हणूनच त्या कुटुंबप्रमुख होत्या. प्रौढावस्थेतील महत्त्वाचा वेळ गरोदरपणा, मुलांचे पालनपोषण व सांभाळ ह्यामध्ये जात असल्यामुळे त्या मातृत्वाला

उपयुक्त अशा उत्पादनाच्या कामांमध्ये सामील असत. त्या काळात लोक शिकार आणि अन्न गोळा करणे यावर जगत असत; आणि म्हणून कदाचित पुरुष शिकारीला जास्त जात असत आणि स्त्रिया अन्न गोळा करायला जास्त जात असत. आज आपण आपल्या आसपासचा समाज पाहतो त्यापेक्षा वेगळा असा मातृप्रधान समाज होता.

मातृप्रधान समाज म्हणजे स्त्रियांचे पुरुषांवर नियंत्रण असा अर्थ नव्हे; मूलतः समाज समतावादी होता. उत्पादनाची साधने म्हणजे कच्चा माल आणि उत्पादनासाठी वापरली जाणारी हत्यारे समाजाच्या मालकीची होती, आणि श्रमाचे फळ सर्वांमध्ये समान वाटले जायचे. पृथ्वीवर मानव समाज अस्तित्वात असल्यापासून बहुतांश काळापर्यंत समाजात असमानता, शोषण आणि स्पर्धा नव्हत्या, खाजगी मालमत्ता नव्हती. समाज खरोखरीच सामूहिक पद्धतीने राहत असून, जन्मापासून मृत्यूपर्यंत प्रत्येक व्यक्तीचे पोषण आणि संरक्षण समूह करत असे. शासक आणि वर्गविभागणी नव्हती. लोकांमध्ये संपत्ती ताब्यात घेण्याची हाव नव्हती. मनुष्यप्राणी मूळातच स्वार्थी आणि हाव असणारा आहे अशी आपली सामान्य समज इतिहासात दिसून येत नाही; अधिकार, आदब, हाव आणि क्रूरपणा हे माणसाच्या स्वभावाचे नैसर्गिक पैलू नाहीत. उलट, मानवी समाज हा मुख्यत्वे सामाजिक, काळजी घेणारा आणि निःस्वार्थी आहे.

साधारणपणे १० ते १२ हजार वर्षांपूर्वी पृथ्वीवर शेतीयोग्य परिस्थिती निर्माण झाली, लोक शेती करू लागले आणि अन्नधान्याचे उत्पादन वाढू लागले. जगभरामध्ये अनेक ठिकाणी मानवी सभ्यतांचा विकास व्हायला सुरुवात झाली. उत्पादनाच्या पद्धती विकसित झाल्या आणि अतिरिक्त (गरज भागवून उरणारे) उत्पादन व्हायला सुरुवात झाली, विशेषतः शेतीतील सुधारणांमुळे अन्नधान्याच्या उत्पादनात वाढ व्हायला सुरुवात झाली. लोकसंख्याही वाढली. ह्यामुळे समाजातील स्त्रियांचे महत्त्व बदलले—आता समूहाच्या अस्तित्वासाठी असलेल्या त्यांच्या पुनरुत्पादनाच्या भूमिकेचे महत्त्व कमी झाले. त्याचबरोबर त्यांच्या उत्पादनातील भूमिकेच्या महत्त्वामध्येही बदल झाला. हत्यारांमध्ये सुधारणा झाल्यामुळे शिकार करणे सोपे होऊ लागले, अन्न गोळा करण्यापेक्षा ते अधिक महत्त्वाचे झाले. जेव्हा फावड्या सारख्या हत्यारांनी शेती करावी लागत होती तेव्हा स्त्री–पुरुष दोघांचेही सारखेच महत्त्व होते. पण जड हल घेऊन शेती करायला सुरुवात झाल्यानंतर, सर्वसाधारणपणे पुरुषच जड हल घेऊन शेती करत असल्यामुळे पुरुषाचे शेतीतही महत्त्व वाढू लागले.

जसजसे अतिरिक्त उत्पादन होऊ लागले, तसतसे समूहातील काही लोकांचे त्यावर नियंत्रण स्थापित होऊ लागले, त्यांची प्रतिष्ठा वाढू लागली आणि ह्याप्रकारे

समाजाची वर्गांमध्ये विभागणी व्हायला सुरुवात झाली. ह्या विभागणीला योग्य ठरवण्यासाठी पुरोहित वर्गही अस्तित्वात आला. अर्थातच हे होण्यासाठी बराच कालावधी लागला असावा. त्याचबरोबर, समाजात आणखी एक मोठी विभागणी झाली, ती म्हणजे स्त्री आणि पुरुषांमधील विभागणी. आधी स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने निर्णय घेत असत; आता महिलांच्या उत्पादनातील कमी महत्त्वाच्या भूमिकेमुळे, पुरुषांच्या तुलनेत त्यांचा दर्जा दुय्यम झाला आणि त्या पुरुषांवर अवलंबून राहू लागल्या. उत्पादनाच्या आणि निर्वाहाच्या साधनांवर पुरुषांचे नियंत्रण आले व महिला घरामध्ये कैद झाल्या. परिवाराचे स्वरूप पुरुषसत्ताक बनले आणि स्त्रिया पित्याची/नवऱ्याची मालमत्ता बनल्या.

लोक ह्या सर्व विभागणीविरुद्ध लढले, त्यांनी अधिकाधिक अधिकार प्राप्त करून घेतले आणि ह्याप्रकारे समाज बदलत गेला. मागच्या तीन–चार हजार वर्षांत जगभरात निरनिराळ्या ठिकाणी समाजात उत्क्रांती होऊन मध्ययुगीन काळात सामंती व्यवस्था आणि त्यानंतर आजची भांडवली व्यवस्था अस्तित्वात आली. पण ह्या सर्व समाजात वर्गविभागणी आणि पुरुषसत्ताक व्यवस्था होती.

## भांडवलशाही आणि स्त्री समानता

गेल्या २५० वर्षांत, भांडवलशाहीमुळे औद्योगिक क्रांती झाल्यानंतर, उत्पादन एवढ्या प्रचंड प्रमाणात वाढले की आज सर्व माणसांच्या मूलभूत गरजा पूर्ण होऊ शकतील असा समाज तयार करणे शक्य आहे—कामाचे तास कमी करून लोकांसाठी भरपूर मोकळा वेळ मिळू शकेल अशी चांगल्या पगाराची नोकरी, उच्च दर्जाची आरोग्यसेवा व शिक्षणव्यवस्था, सर्वांसाठी स्वस्त आणि पौष्टिक भोजन, म्हातारपणी सन्मानजनक पेन्शन, झोपडवस्त्या आणि काड्यापेटी सारखी छोटी छोटी घरे जाऊन त्याऐवजी सर्वांसाठी सर्व सोयी सुविधांनी युक्त चांगल्या निवासाची सोय, प्रदूषण-मुक्त व स्वच्छ वातावरण – आणि अशा आणखी अनेक गोष्टी. जर आज हे होऊ शकत नसेल तर, त्याचे कारण भांडवली अर्थव्यवस्था आहे, त्या अर्थव्यवस्थेच्या रचनेमध्ये आहे. या रचनेमुळे एका बाजूला जगभरामध्ये प्रचंड प्रमाणात गरीबी आहे, आणि दुसऱ्या बाजूला, जगभरातील उत्पादनांच्या साधनांपैकी प्रचंड मोठा हिस्सा मूठभर कॉर्पोरेशन्सच्या ताब्यात आहे आणि मुठभर धनदांडग्यांच्या हातात जगातील बहुतांश संपत्तीची मालकी आहे.

त्याचबरोबर, भांडवलशाहीने स्त्रियांना शिक्षणाची दारे उघडून, घराबाहेर रोजगाराच्या संधी निर्माण करून (म्हणजे पति, वडिल व कुटुंबापासून आर्थिकदृष्ट्या

स्वावलंबी बनवून) त्यांची पितृसत्तेतून मुक्त होण्याची परिस्थिती तयार केली आहे. तसेच, भांडवलशाहीने स्वातंत्र्य व समानतेच्या मूल्यांनाही जन्म दिला. या वाढलेल्या जागृतीमुळे आणि आर्थिक स्वावलंबनामुळे स्त्री-मुक्तीच्या आंदोलनाचा पाया घातला गेला. अर्थातच, स्त्री-मुक्तीची चळवळ हा एक दीर्घ काळ चालणारा व कठीण संघर्ष आहे. त्यामध्ये चढ-उतार येतील: आणि खऱ्या अर्थाने ती पुढे नेण्यासाठी आणि त्यात यश मिळवण्यासाठी जाणीवपूर्वक, निर्धारित, संघटित आणि नियोजित प्रयत्न करायला लागतील.

अतिशय निर्दयपणे शोषण करणाऱ्या या व्यवस्थेच्या विरोधात लोकांचा वीरोचित संघर्ष चालू आहे. हा संघर्ष पसरतही आहे आणि अधिकाधिक तीव्र होत आहे—दक्षिण अमेरिकेतील अनेक देशांमध्ये जनआंदोलने लोकशाही पद्धतीने सत्तेवर आली आहेत व एका समतावादी समाजाची निर्मिती करण्याकडे प्रयत्न करत आहेत.

## चळवळीचे शत्रू कोण आहेत

स्त्री-मुक्ती चळवळीच्या कार्यकर्त्यांना एक प्रश्न नेहमी विचारला जातो की “चळवळीचे शत्रू कोण आहेत?” वरवर पाहता, कुटुंबाअंतर्गत व समाजात स्त्रियांची गुलामी आणि दुय्यमत्व पुरुषांसाठी सोयीचे आहे, तेव्हा साहजिकच पुरुष स्त्रियांचे शत्रू आहेत असे वाटू शकते, पण प्रत्यक्षात स्त्री आणि पुरुष दोघेही पितृसत्तेचे बळी आहेत. दोघेही वेगवेगळया प्रकारे प्रभावित आहेत. पुरुष मर्दानगीच्या मानसिकतेत तयार होतात, आणि स्वतःला स्त्रियांपेक्षा श्रेष्ठ समजू लागतात; तर स्त्रिया स्त्रीत्वाच्या साच्यात जातात आणि पुरुषांच्या तुलनेत आपण दुय्यम आहोत यावर विश्वास ठेऊ लागतात. पुरुषांना जरी या व्यवस्थेतून जास्त फायदा मिळत असेल आणि त्यामुळे ही व्यवस्था अशीच चालू राहावी असे वाटत असेल तरी त्याचा अर्थ पुरुष शत्रू आहेत असे नाही. आपण एक प्रश्न विचारला तरी आपल्याला याचे उत्तर समजू शकते. पुरुषांच्या शिवाय समाजाची कल्पना करणे शक्य आहे का? नक्कीच नाही. म्हणूनच, स्त्रियांचे स्वातंत्र्य हे स्त्री-पुरुष समानता स्थापित करून, स्त्री-पुरुष दोघांनाही पितृसत्तेच्या विळख्यातून बाहेर काढून, दोघांमध्येही एकमेकांबद्दल आदर आणि सन्मान निर्माण करण्यासाठी जनजागृती करून, आणि त्याचवेळेला महिलांवर होणारे लैंगिक अत्याचार, छेडछाड, स्त्रियांच्या शरीराचे वस्तूकरण, अन्याय्य कायदे अशांसारख्या पितृसत्तेमुळे स्त्रियांवर होत असलेल्या हिंसा आणि अत्याचारांच्या विरोधात संघर्ष उभारून मिळवता येऊ शकते.

स्त्री मुक्तीचा खरा शत्रू पुरुष नसून स्त्रीला गुलाम बनवणारी पुरुषसत्ताक

मानसिकता आणि पुरुषसत्ताकता स्थापित होण्यासाठी आणि बळकट करण्यासाठी निर्माण केलेल्या जुनाट रूढी, परंपरा, आचार विचारांची बंधने ह्या गोष्टी आहेत.

## भारतामधील परिस्थती

स्वातंत्र्यानंतर भारतात नेहरू-प्रणित विकासाचे आर्थिक धोरण राबवण्यात आले ज्याला सर्वसामान्यपणे मिश्र आर्थिक व्यवस्था म्हटले जाते किंवा विकासाचे नेहेरू मॉडेल म्हणून प्रसिद्ध आहे. मूलतः ते भांडवली विकासाचे मॉडेल होते. गेल्या सत्तर वर्षात भारतात जसजशी भांडवलशाहीची मुळे खोल रुजत गेली, तसतसे भारतीय समाजात सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रात लक्षणीय बदल होत गेले, आणि स्त्रियांची समाजातील परिस्थितीही बदलत गेली. शिक्षणाच्या प्रसारामुळे, दळणवळणाच्या साधनांच्या विकासामुळे, घराच्या चार भिंतीत कैद आणि त्यालाच आपले विश्व मानणारी स्त्री आता बाहेर पडली आहे. विविध सामाजिक उत्पादनांमधील स्त्रियांच्या योगादानामध्ये वाढ होत गेली. आणि म्हणून भारतामध्ये स्त्रियांच्या चळवळीचा पाया रचला गेला.

पन्नास वर्षापूर्वी स्त्रीमुक्तीवादी विदुषी महादेवी वर्मासारखी एखादीच स्त्री चळवळीचे स्वप्न बघू शकत होती, स्त्रियांच्या दुर्दशेवर परखडपणे बोलू शकत होती, पण एक व्यापक जनवादी स्त्रीमुक्ती चळवळ त्या काळात संघटित करणे खूपच कठीण होते. त्याचे कारण हे की त्या काळातील स्त्रियांना आजच्या एवढी समज नव्हती आणि एवढ्या मोठ्या संख्येने ती घराचा उंबरठा ओलांडून बाहेरही पडली नव्हती. गेल्या पन्नास वर्षातील भांडवली विकासामुळे परिस्थिती बदलली आहे. स्त्रियांची नुसती जाणीवच वाढली आहे असे नव्हे तर त्या आता आर्थिकदृष्ट्या अधिक स्वतंत्र झाल्या आहेत. मध्ययुगीन आणि सरंजामी विचारांची पकड सुटल्यामुळे महिलांना मोठ्या संख्येने माणूस म्हणून स्वतःची ओळख आणि समाजात स्वतःचे स्थान निर्माण करणे शक्य झाले आणि ते मिळवण्यासाठी त्या अथक प्रयत्न करत आहेत.

परिणामी देशभरात स्त्रियांच्या चळवळीची वेगाने वाढ होत आहे. देशाच्या विविध भागांमध्ये लहान लहान गट बनवून अनेक प्रकारच्या स्त्री संघटना कार्यरत आहेत. स्वतःचे हक्क आणि स्वातंत्र्यासाठी स्त्रिया संघर्ष करीत आहेत. देशभर व्याप्ती असलेल्या मोठ्या संघटनाही आहेत. स्त्रियांवर होणारे अन्याय आणि अत्याचारासंबंधित निरनिराळ्या ठिकाणी या संघटना सक्रिय आहेत. आज नाही तर उद्या अशा सर्व संघटना एकत्र येऊन एक मजबूत देशव्यापी स्त्रियांची चळवळ उभी राहील.

## नवी आव्हाने

भारतीय समाजातील गेल्या सत्तर वर्षांत झालेल्या बदलांमुळे अतिशय चैतन्यशील असलेल्या स्त्रियांच्या चळवळीमध्ये वेगाने वाढ झाली आहे, पण त्याचवेळी ह्या बदलांमुळे स्त्रीमुक्तीच्या मार्गात अनेक नवनव्या अडचणी निर्माण झाल्या आहेत.

सरंजामी समाजात, स्त्रियांना स्वतःचे अस्तित्व नव्हते आणि त्यांना गुलामाची वागणूक दिली जायची. कुटुंब ही तिची मर्यादा होती आणि अडगळीतल्या सामानाप्रमाणे स्त्रीसुद्धा कुठल्यातरी कोपऱ्यात पडून असायची. ती उरले-सुरले खायची आणि मिळेल ते घालायची. स्वतःचे अस्तित्व नसल्यामुळे तिच्यावर स्वतःच्या अस्तित्वाचे संकट नव्हते. तरीसुद्धा घरातल्या गाई–बैलांची, म्हशींची जशी जबाबदारी घेतली जायची तशीच स्त्रियांचीही देखभाल केली जायची. याउलट, भांडवली समाजाने स्त्रीला घराबाहेर पडण्याची परिस्थिती तयार केली आणि स्वतःची ओळख व अस्मिता जपण्यासाठी जागरूक केले. परंतु त्याबरोबर सरंजामी कुटुंबाचा आधार जाऊन स्त्री एकटी पडली. कुठलाही कौटुंबिक आणि सामाजिक आधार नसताना स्त्रीला एकटीलाच आपली अस्मिता आणि अस्तित्व स्थापित करण्यासाठी संघर्ष करावा लागत आहे.

भांडवलशाही समाजामध्ये कुटुंबात अनेक नवे ताणतणाव आले आहेत; एकत्र कुटुंबपद्धती संपुष्टात आली आहे; आज बहुतांशी वैवाहिक आयुष्यही तणावपूर्ण आहेत. आहे त्याच परिस्थितीत वैवाहिक आयुष्य चालू ठेवण्याऐवजी, गप्प बसून सहन करण्याऐवजी एखादी स्त्री जर प्रतिकाराचा विचार करत असेल तर तिच्यापुढे पहिला प्रश्न असतो की मानसिक, आर्थिक आणि नैतिक आधारांसाठी तिने कोणाकडे पाहायचे? सासरी आणि माहेरी दोन्हीकडे तिला आसरा नसतो. त्यामुळे इच्छा असूनही स्त्रियांना स्वातंत्र्य आणि अस्तित्वासाठी संघर्ष करणे अवघड झाले आहे. शिवाय, भांडवली समाजामध्ये गरिबी आणि बेकारी प्रचंड प्रमाणात वाढली आहे, लोकांमध्ये निराशेची भावना आली आहे; यामुळे गुन्हेगारीही वाढली आहे; बहुराष्ट्रीय कंपन्यांचा माल विकण्याकरता प्रसिद्धीमाध्यमांद्वारे स्त्रियांना उपभोग्य वस्तूच्या रूपातच बाजारात आणले जात असल्यामुळे आणि स्त्रीला सतत शरीराच्या रूपातच दाखवत असल्यामुळे स्त्रियांवरील लैंगिक अत्याचारात वाढ झाली आहे. परिणामतः विधवा, घटस्फोटित, विभक्त, अविवाहित अशा स्त्रियांना समाजामध्ये एकटे जगणे अतिशय धोकादायक झालेले आहे.

आपल्या स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या महिलांना या सर्व अडचणींना सामोरे जावे लागत असूनही, स्त्री स्वातंत्र्यासाठी आज अनेक शक्यता उपलब्ध झाल्यामुळे, अनेकींनी आपल्या पातळीवर पारंपरिक जीवनपद्धती नाकारली आहे. पण सरंजामशाही परंपरा नाकारताना, एकएकटीने वैयक्तिकरित्या माणूस म्हणून स्वतःची ओळख निर्माण करण्यासाठी लढत असताना, त्यांचा लढा हा एका मोठ्या स्त्री-मुक्ती आंदोलनाचा भाग आहे याची जाणीव त्यांना नसते. ही जाणीव त्यांच्यामध्ये निर्माण करून देणे ही स्त्री चळवळीची जबाबदारी आहे. संघर्ष करणाऱ्या या बंडखोर स्त्रियांना कुटुंब आणि समाजामधील आपल्या दुय्यम दर्जाची जाण आहे; त्यांना पितृसत्तेच्या साखळया तोडून त्यातून स्वतःची सोडवणूक करून घ्यायची आहे. त्यांच्या समस्या ह्या फक्त त्यांच्याच नसून सर्व स्त्रियांच्या आहेत याची जाणीव करून देण्याचे कर्तव्य स्त्री चळवळीचे आहे. जेव्हा त्या व्यापक स्त्री-मुक्ती चळवळीत सामील होतील तेव्हाच त्यांना खऱ्या अर्थाने स्वातंत्र्य मिळेल. स्त्रियांसमोर असलेल्या छोट्या-छोट्या स्वप्नांच्या जागी संपूर्ण स्त्रीवर्गासाठी समाजात गौरवास्पद स्थान प्राप्त करून घेण्याचे मोठे स्वप्न आपण ठेवले पाहिजे.

गेल्या तीन दशकात, म्हणजे १९९१ पासून जागतिकीकरण, उदारीकरण आणि खाजगीकरणाच्या नावाखाली भारतीय राज्यकर्त्यांनी बहुराष्ट्रीय कंपन्यांना भारतात मुक्त प्रवेश द्यायला सुरुवात केली आहे. देश आता फक्त महाकाय परकीय कंपन्यांच्या आणि त्यांच्या भारतीय भागीदारांच्या नग्न नफेखोरीसाठीच चालत आहे. एक नवीन प्रकारचा ‘वसाहतवाद’ देशावर लादला जात आहे. परिणामी सामाजिक विषमता, बेरोजगारी आणि प्रचंड प्रमाणात गरीबी वाढली आहे. जसजसे लोक दारिद्र्यरेषेच्या खाली ढकलले जात आहेत तसतशी स्त्रियांची मूळातच वाईट असलेली स्थिती अजूनच खालावत आहे. जागतिकीकरणामुळे शिक्षण, आरोग्य व इतर सामाजिक सेवांमध्ये होणाऱ्या कपातीचा फटका पहिल्यापासूनच उपेक्षित असलेल्या स्त्रियांच्या स्थितीला बसत आहे.

आर्थिक स्वावलंबन ही स्त्रीस्वातंत्र्याची पहिली पायरी आहे, त्यासाठी स्त्रियांनी शिक्षण घेऊन नोकरी करणे आवश्यक आहे. पण जागतिकीकरणामुळे रोजगारांची संख्या खूपच कमी झालेली आहे आणी जे रोजगार उपलब्ध आहेत ते ही फक्त अत्यंत कमी पगाराचे आणि असंघटीत क्षेत्रात आहेत. महागाईत झालेल्या कमालीच्या वाढीमुळे, स्त्रियांना आर्थिक स्वायत्तता मिळविणे दुरापास्त झाले आहे किंबहुना दोन वेळचे जेवण मिळविण्यासाठी देखील फार संघर्ष करावा लागतो आहे.

जागतिकीकरणाने स्त्रीला गुलाम बनवण्याचे नवनवीन प्रकार अस्तित्वात आणले

आहेत. महाकाय कंपन्यांचे बाजारावर वर्चस्व आहे. त्यांच्या मालाचा खप वाढावा म्हणून ते वेगवेगळया क्लुप्त्यांचा वापर करतात, आणि त्यांतील एक सामान्य तंत्र आहे जाहिरातींसाठी स्त्री शरीराचा वापर. स्त्रियांच्या शरीराच्या उत्तान जाहिराती हे अलीकडे स्त्रियांवरील वाढत्या अत्याचारांमागील एक महत्त्वाचे कारण आहे.

## पुढील मार्ग

मानवजातीच्या भांडवली जागतिकीकरणाच्या शोषणाविरोधात सुरू असलेल्या संघर्षापासून स्त्री-मुक्ती चळवळीचा संघर्ष वेगळा करून पाहता येणार नाही. म्हणूनच स्त्रीमुक्तीला मानव मुक्तीपासून तोडून बघताच येणार नाही. या समाजातील सर्व कष्टकरी, कामगार, दलित, अल्पसंख्य व इतर पीडितांच्या संघर्षाला जोडूनच स्त्रियांच्या आंदोलनाला सर्व प्रकारच्या अन्याय आणि शोषणाविरोधात लढा द्यावा लागेल.

अर्थातच ह्याचा अर्थ असा नाही की स्त्री-पुरुष समानतेचा संघर्ष स्थगित करून भांडवली-साम्राज्यवादी शोषणाविरुद्धच्या संघर्षाला प्राधान्य देणे. स्त्री-मुक्ती चळवळीपुढील सर्वप्रथम महत्त्वाचे कार्य आहे की, स्त्रियांना त्यांच्या सध्याच्या परिस्थितीची जाणीव करून देणे आणि स्वतःची ओळख निर्माण करून देण्यासाठी, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय क्षेत्रांमध्ये स्त्री-पुरुष समानता प्राप्त करण्याच्या संघर्षासाठी प्रोत्साहित करणे व संघटित करणे. हा सततचा आणि दैनंदिन संघर्ष असून, तो करणे अपरिहार्य आहे. हे स्त्री चळवळीचे आजचे काम आहे. पण हा रोजचा संघर्ष करत असताना स्त्रियांच्या चळवळीचे अंतिम ध्येय नजरेआड करून चालणार नाही. तो आत्मघात ठरेल. पण स्त्रीमुक्तीचे लक्ष्य साध्य करण्यासाठी अशा एका नवसमाजाची गरज आहे जो न्याय्य असेल, समानता प्रस्थापित करणारा असेल. असा समाज निर्माण करणे हे स्त्री चळवळीचे दूरगामी ध्येय असले पाहिजे. दैनंदिन संघर्ष हे ह्याच दूरगामी लढाईची सुरुवात आहेत. हेच लक्ष्य समोर ठेवून एक एक अडथळा पार करत पुढे जायला हवे. माणूस म्हणून आपले अस्तित्व प्रस्थापित करण्याचा दैनंदिन संघर्ष चालू असतानाच, भांडवलाचा उदो उदो करणारी नव्हे तर सर्व लोकांच्या गरजा भागवून सन्मान्य, समाधानी, सार्थक, सुरक्षित व जास्तीत जास्त निर्मितीशील आयुष्य घडवणारी व्यवस्था आणण्यासाठी झटले पाहिजे.

दुःख काय तुला मोडेल, तूच दुःखाला मोडून टाक ।<br>
केवळ तुझे डोळे, इतरांच्या स्वप्नांशी जोडून घे ॥

* * *



# आमच्याबद्दल:

# अभिव्यक्ती

भारतातील महिलांच्या परिस्थितीत खूपच परिवर्तन झाले आहे. आज मोठया प्रमाणात स्त्रिया निरनिराळ्या व्यवसायात आत्मविश्वासाने वावरताना दिसत आहेत. अभियांत्रिकी आणि व्यवस्थापनात नोकऱ्या करत आहेत, व्यवसाय करत आहेत, राजकारणात भाग घेऊ लागल्या आहेत, पोलीस आणि संरक्षण खात्यात नोकऱ्या करत आहेत, प्रशासक बनत आहेत, खेळांमध्ये नैपुण्य दाखवत आहेत . . .

समाजातील स्त्रियांचे दुय्यम स्थान आणि त्यांच्यावर होत असलेये अन्याय यांच्याबद्दल समाजाची जाणीव वाढलेली आहे. आपल्याला पहिल्यापेक्षा जास्त अधिकारही मिळाले आहेत. हुंडा, कौटुंबिक अत्याचार पासून कामाच्या ठिकाणी महिलांवर होणारा लैंगिक अत्याचार या सगळ्यावर अनेक कायदे मिळाले आहेत.

ह्या सगळ्यामागे शेकडो वर्षांचा संघर्षाचा इतिहास आहे. त्यासाठी आपल्या अनेक मैत्रिणींना अपमान सोसावा लागला आहे. त्यांच्याच प्रयत्नांमुळे आपण आज अधिक चांगले जीवन जगत आहोत.

एवढी प्रगती होऊनही स्त्रियांना समाजामध्ये अजूनही अनेक प्रकारचे भेदभाव व शोषणाचा सामना करावा लागतो. फक्त संविधानात लिहिल्याने किंवा कायदे बनवून समाज बदलत नाही. आणि समाज बदलल्याशिवाय, त्याची मानसिकता बदलल्याशिवाय स्त्री-पुरुष समानता येऊ शकत नाही. उदा. अनेक मुली आज शिक्षण घ्यायला लागल्या आहेत, पण ते केव्हाही सोडायला लागेल ह्या भीतीखाली असतात. मुलीच्या शिक्षणाचा उपयोग तिच्या विकासासाठी न होता लग्नासाठी उमेदवारी म्हणून असतो. लग्नाच्या संपूर्ण प्रक्रियेमध्ये तिची गुणवत्ता महत्त्वाची नसून अजूनही हुंडाच महत्त्वाचा असतो. जर एखादी मुलगी लग्नाआधीपासून नोकरी करत असेल, तरी लग्नानंतर तिने नोकरी करायची किंवा नाही याचा निर्णय तिचा नवरा आणि सासरचे लोक घेतात, ती घेऊ शकत नाही.

स्वातंत्र्याच्या सत्तर वर्षांनंतरही स्त्रियांवर अतोनात अन्याय होत आहेत. छेडछाड, गर्भलिंग चिकित्सा, लहान मुलींची खरेदी-विक्री, हुंडाबळी, पत्नी म्हणून होणारे अपमान आणि अत्याचार, विधवा व परित्यक्तांना मिळणारी वर्तणूक अशा अनेक रूपांमध्ये ते सतत सुरूच असतात. स्त्री-पुरुष भेदभावाचे २१व्या शतकातीलही अत्यंत क्रूर उदाहरण म्हणजे स्त्री लिंगी गर्भपात. ते शक्य झाले नाही, तर जन्माला आल्याबरोबरच तिला मारून टाकणे.

गेल्या काही वर्षांमध्ये महिलांच्या शोषणाचा एक नवीन प्रकार विकसित झाला आहे—जाहिरातींच्या माध्यमातून स्त्रीची भोगवस्तू म्हणून प्रतिमा उभी करणे. याशिवाय आपला माल विकण्यासाठी सौंदर्यप्रसाधनांच्या कंपन्या व फॅशन उद्योगाने देशपातळी पासून गल्लीबोळांपर्यंत सौंदर्यस्पर्धांना प्रोत्साहन दिले आहे. स्त्री देहाचे असे वस्तूकरण करून तिला फक्त शरीरापुरते मर्यादित ठेवणे हे स्त्रियांवरील वाढत्या हिंसेचे एक कारण आहे.

आपल्याला हे सगळे माहीत नाही किंवा आपण ह्यावर विचार करत नाही असे नाही. उलट तुम्ही आम्ही कुठल्या ना कुठल्या रूपात ह्याची शिकार झालेले असतो. पण आपल्या डोळ्यांवर संस्कारांची पट्टी अशी काही बांधलेली असते की आपण ह्याकडे डोळेझाक करतो.

ह्या सगळ्याचा विरोध करण्यासाठी आम्ही अभिव्यक्ती ह्या स्त्रियांचा गटाची स्थापना केली आहे. आम्ही तुमच्यासारख्याच सामान्य मुली आणि स्त्रिया आहोत. यात महिलांबरोबरच संवेदनशील पुरुषही आहेत. समाजात स्त्रीला माणूस म्हणून जगता येईल असा समाज निर्माण निर्माण करण्यासाठी आम्ही प्रयत्नशील आहोत. स्त्रीस्वावलंबन, स्त्रीसबलीकरण व स्त्रीस्वातंत्र्य अशा विषयांबाबत लोकांमध्ये जाणीव वाढवण्यासाठी आम्ही विविध कार्यक्रम आयोजित करत असतो. त्यासाठी रस्ते-मोहिमा, परिसंवाद, माहितीपट-प्रदर्शन, गाणी व पथ-नाट्य, मोर्चे, नाटके, इ. वेगवेगळे कार्यक्रम करत असतो.

स्त्रिया आणि पुरुष दोघेही आमचे लक्ष्य आहेत. स्त्रीस्वातंत्र्याबद्दल पुरुषांनाही संवेदनशील करणे गरजेचे आहे असे आम्हाला वाटते. कारण स्त्रीस्वातंत्र्याची लढाई ही फक्त स्त्रियांची नसून ती संवेदनशील पुरुषांच्या सक्रिय समर्थन आणि सहभागानेच साध्य होईल असा आमचा विश्वास आहे. आमचा असाही विश्वास आहे की ज्या समाजात कष्टकरी आणि कामगार वर्गांचे शोषण होते तिथे स्त्रीस्वातंत्र्य साध्य होणार नाही. म्हणूनच अभिव्यक्ती कष्टकरी, कामगार, दलित, आदिवासी, अल्पसंख्य आणि समाजातील सर्व पीडित घटकांच्या आंदोलनांबरोबर जोडून घेऊन काम करत आहे.

## स्वप्न पाहण्याचे धाडस करा!

स्वप्न पाहण्याचे धाडस केले की कृती करण्याचे धैर्य येते! दीडशे वर्षांपूर्वी सावित्रीबाई फुले यांनी जेव्हा दलित मुलींसाठी पहिली शाळा काढली, तेव्हा त्यांचे स्वप्न—जात आणि लिंगापलीकडे समाजातील सर्वांना शिक्षणाच्या समान संधी मिळाव्यात—बहुतेकांना अशक्यप्राय वाटत होते. पण आज आपण त्या स्वप्नाच्या पूर्ततेत खूप पुढे आलो आहोत; लाखोंच्या संख्येने आज मुली आणि दलित शिक्षण घेत आहेत. म्हणूनच आपणही उच्च स्वप्ने पाहण्यचे धाडस करूया. एका नवीन, सुंदर, न्याय्य—जिथे स्त्री–पुरुष खऱ्या अर्थाने स्वतंत्र आणि समान असतील—अशा नवसमाज निर्मितीचे स्वप्न पाहण्याची वेळ आलेली आहे. पुढाकार घेऊन अशा समाजनिर्मितीसाठी कृती कार्यक्रम राबवण्याची वेळ आलेली आहे. सुरुवात झाली तरच त्याचा शेवट होतो. देशभरात अनेक स्त्रिया आणि पुरुष असा पुढाकार घेताना दिसत आहेत; आपणही आपले लहान-लहान पुढाकार घ्यायला सुरुवात करून पुढे जाऊया. चला, आपण एकमेकांपर्यंत पोचण्याचा प्रयत्न करूया, आपली सुखदुःख आणि समस्या एकमेकांमध्ये समजून घेऊया आणि हातात हात घालून पुढे जाऊया. हळूहळू अधिकाधिक लोक आपल्याला येऊन मिळतील . . .

आम्ही अभिव्यक्तीतर्फे पुण्यामध्ये अनेक प्रकारचे कार्यक्रम करत असतो. आपण ह्या सर्व कार्यक्रमांमध्ये सहभागी होऊ शकता.

- बिनधास्त बोलः महिलांच्या प्रश्नांवर आधारित विविध विषयांवरील माहितीपट प्रदर्शन व चर्चा, स्त्री हिंसाचारावरील ‘I am Nirbhaya’ माहितीपट महोत्सव;
- स्त्री चळवळींनी आत्तापर्यंत लढून मिळवलेल्या कायद्यांवर व्याख्यान;
- पुरुषभान: मी पुरुष म्हणून कसा घडलो यावर तरुण मुलांबरोबर संवाद;
- अनेक विषयांवरील सडक नाटके;
- व्याख्यान – स्त्रियांवरील हिंसाचाराची कारणे;
- चाकोरी तोडताना – लिंगभाव समजून घेताना ह्याविषयावर कार्यशाळा;
- रस्त्यावरील अभियाने: उदा. ब्लॅक इज ब्युटिफूल, घर दोघांचे मग घरकाम फक्त बाईचेच कसे?, स्त्रियांच्या स्वच्छतागृहांसाठी अभियान, नैसर्गिक पाळी अपवित्र कशी?, पुरुषभान इ.इ.

जर आपल्याला आमच्याबरोबर सक्रिय व्हायचे असेल तर आमच्या पुढील पत्त्यांवर संपर्क करू शकता.

## अभिव्यक्ती: संपर्क


अभिव्यक्ती, c/o लोकायत, सिंडिकेट बँकेसमोर, लॉ कॉलेज रोड, नळस्टॉपजवळ, पुणे–४

*(या पत्त्यावर दर महिन्याच्या पहिल्या रविवारी सकाळी ९:३०–१२ या वेळेत अभिव्यक्तीची मीटिंग होते, आणि दर रविवारी संध्या. ५–७:३० या वेळेत लोकायतची मीटिंग होते.)*

अलका जोशी – 9422319129

मोनाली चं.अ. – 9881241415

www.lokayat.org.in

pune.abhivyakti@gmail.com

abhivyakti.pune

lokayatpune


## आमची मराठी प्रकाशने

| | | |
|---|---|---|
| ये दिल मांगे मौत (कोक–पेप्सी भारत छोडो) | ₹ | ५/– |
| देवळांचा धर्म आणि धर्माची देवळे | ₹ | ५/– |
| हे मला माहीत हवं! | ₹ | ५/– |
| तरुणांनो, विचार कराल तर . . . | ₹ | ५/– |
| विवेकवादी, विज्ञानवादी, समाजवादी विवेकानंद | ₹ | ५/– |
| मी नास्तिक का आहे (लेखक: शहीद भगतसिंग) | ₹ | ५/– |
| कोळी आणि माशी (लेखक: विल्हेल्म लिबनिश्ट) | ₹ | ५/– |
| सार्वजनिक विमा क्षेत्र लिलावात | ₹ | ५/– |
| लढा वॉलमार्टशी | ₹ | १०/– |
| मुलगा म्हणजे? मुलगी म्हणजे? (लेखिका: कमला भसीन) | ₹ | १०/– |
| नोटाबंदी: काय कमावले? काय गमावले? | ₹ | १०/– |
| आर एस एस ला ओळखा (लेखक: शम्सुल इस्लाम) | ₹ | १०/– |
| शहीद भगतसिंगचे तरुणांना आवाहन | ₹ | १५/– |
| शिक्षणाची राखरांगोळी | ₹ | १५/– |
| जगण्याच्या हक्काचे आंदोलन | ₹ | १५/– |
| भारत पुन्हा गुलामीकडे | ₹ | २०/– |
| देशावर फॅसिझमचे संकट | ₹ | २०/– |
| सरकार खरंच गरीब आहे का? | ₹ | २०/– |
| आण्विक वेडेपणा | ₹ | २०/– |
| बेरोजगारीचे संकट: कारणे आणि उपाय | ₹ | २५/– |
| उठ माणसा: गाणी संघर्षाची | ₹ | ३०/– |
| जागतिकीकरण की नवी गुलामगिरी? | ₹ | १५०/– |

# या पुस्तिकेतून . . .

- भारतीय राज्यघटनेने स्त्री–पुरुष समानता दिलेली आहे. पण नुसते संविधानात लिहिल्याने समानता येत नाही.
- मुलींना अशाप्रकारे वाढवलं जाते की त्यांचे व्यक्तिमत्व ढब्बू, संकुचित, परावलंबी, अंतर्मुख, आत्मविश्वास नसलेले आणि मानसिकदृष्ट्या अपंग बनते.
- आजही लग्न हीच स्त्रीच्या आयुष्याची इतिकर्तव्यता आहे. मुलीच्या शिक्षणाचा उपयोग तिच्या विकासासाठी न होता लग्नासाठी उमेदवारी म्हणून असतो. लग्नाच्या संपूर्ण प्रक्रियेमध्ये तिची गुणवत्ता महत्त्वाची नसून अजूनही हुंडाच महत्त्वाचा असतो.
- स्त्रीच्या सौंदर्याकडे पाहण्याचा समाजाचा दृष्टीकोन आजही फक्त शरीराशी जोडलेला आहे. बाहुलीसारखी सजली-सवरलेली, लाजरी-बुजरी, संकोचणारी स्त्रीच सुंदर समजली जाते. म्हणजे स्त्रीच्या बाह्य सौंदर्यालाच जास्त महत्त्व दिले जाते, आंतरिक सौंदर्याला काहीही महत्त्व नाही.
- अत्यंत रूढीप्रिय आणि पुराणमतवादी भारतीय समाजामध्ये मॉडेलिंगसारख्या कामाला अचानक मानाचे स्थान कसे काय मिळू लागले?
- अनेक लोक—बायका आणि पुरुष—हेच सांगतात की बाईच बाईची शत्रू आहे. हे खरे आहे का?
- जसे 'स्त्री जन्माला येत नाही, घडविली जाते' तसेच 'पुरुषही जन्माला येत नाही, घडविला जातो'. पितृसत्ताक व्यवस्था ही स्त्रीमध्ये स्त्रीत्वाची भावना जागृत करते तर पुरुषामध्ये पितृसत्तेला पोसण्याचे काम 'मर्दानगी' करते.
- स्त्रीमुक्तीला मानव मुक्तीपासून तोडून बघताच येणार नाही. स्त्रीमुक्तीचे लक्ष्य साध्य करण्यासाठी अशा एका नवसमाजाची गरज आहे जो न्याय्य असेल, समानता प्रस्थापित करणारा असेल. असा समाज निर्माण करण्यासाठी सर्व कष्टकरी, कामगार, दलित, अल्पसंख्यांक व इतर पीडितांच्या संघर्षाला जोडूनच स्त्रियांच्या आंदोलनाला सर्व प्रकारच्या अन्याय आणि शोषणाविरोधात लढा द्यावा लागेल.


अभिव्यक्ती

सोशलिस्ट पार्टी (इंडिया)

janata
जनता साप्ताहिक, मुंबई